# मी जेन गुडॉल आहे!

ब्रैड मेल्टज़र, चित्र : क्रिस्टोफर

मराठी : अश्विनी बर्वे



जेव्हा ती छोटी होती, जेन गुडॉल प्राण्यांवर प्रेम करते असे- त्यात कुत्र्यांपासून ते बागेतले किडे, तिच्या आवडीची स्टफड खेळणी, जुबली चिम्पाझी सुद्धा होता. आणि जेव्हा ती मोठी झाली, तेव्हा तिला प्राकृतिक जगाबद्दल जे काही शक्य होतं ते सगळं तिला शिकायचं होतं. म्हणून, जेनने आफ्रिकेचा प्रवास केला आणि जंगलात आपलं नवीन घर थाटलं. ती जंगलात चिंपांझीचा अभ्यास करणार होती. आणि त्यांचा विश्वास प्राप्त करणारी ती पहिली वैज्ञानिक झाली. आज, जेन गुडॉल जगातल्या सगळ्यात महत्वाच्या वैज्ञानिक, पर्यावरणवादी आणि पशू तज्ञापैकी एक आहे.

आपण सगळे हिरो होवू शकतो.



# मी जेन गुडॉलआहे !

ब्रैड मेल्टज़र, चित्र : क्रिस्टोफर




मी जेन गुडॉल आहे !


माझ्या पहिल्या वाढदिवसाला, माझ्या वडिलांनी माझ्यासाठी जुबली नावाचा एक गोड खेळण्यातला चिंपांझी खरेदी केला..
जुबली...जेन ला भेट !
मला जुबली आवडला, खरंच माझं त्याच्यावर खूप प्रेम होतं.


मी प्रत्येक वेळी जुबलीला आपल्या बरोबर ठेवायची.
जस-जशी मी मोठी झाले, मी माझी सर्व खेळणी टिचर टिचर खेळण्यासाठी एका रांगेत ठेवत असे. त्यात जुबली एकमात्र होता ज्याला बसायला खुर्ची होती.
ठीक आहे, आता कोण सांगेल की सशाला काय खायला आवडतं?
हो, जुबली!
नेहमीप्रमाणे बरोबर


खरंतर, मी फक्त आपलं खेळणं चिंपांझीवर प्रेम करत नव्हती, माझं सगळ्या प्राण्यांवर प्रेम होतं. – इथपर्यंत की बागेत असणाऱ्या अळ्यावर सुद्धा
तू अळ्या घरात घेवून आली का??
काळजी करू नको. आई .
त्या एकदम सुरक्षित आहेत ..


माझ्या उशीखाली!
माझ्या आईने मला सांगितले की किडे बागेत सुरक्षित राहतील. म्हणून आम्ही त्यांना बाहेर घेवून आलो आणि परत त्यांना मातीत पुरलं..

पांच वर्षाची असतांना ,मी जाणून घ्यायला उत्सुक होते की  कोंबडी अंडी कशी देते, ते बघण्यासाठी मी आजीच्या घरी असलेल्या कोंबड्याच्या खुराड्यात घुसले..

आधी तर सर्व कोंबड्या मला घाबरल्या.



मग मी कोपऱ्यात बसायचं ठरवलं. जर मी थोडीशी हालचाल केली असती तर कोंबड्या पळून गेल्या असत्या. मी खूप धीराने काम केलं.





शेवटी, अनेक तास वाट बघितल्यानंतर ,मी ते बघितलं ज्याची मी वाट बघत होते..

कोंबडीने थोडासा झटका दिला आणि







तो माझा पहिला शोध होता.

माझे प्राण्यांशिवाय निसर्गावर सुद्धा प्रेम होते. मी ओकच्या झाडाचे नाव नुकी, आणि "बीच" च्या झाडाचे नाव बीच. जी माझ्या आवडीचे झाडं होती..

धन्यवाद,
मला इथं बसून
वाचू दिल्याबद्दल.

हो, अजून एक गोष्ट होती जी मला खूप आवडत होती - वाचणे.

त्याकाळी माझ्या कुटुंबांकडे जास्त पैसे नव्हते. म्हणून पुस्तके घेण्यासाठी आम्ही वाचनालयात जात असू. जेव्हा मी सात वर्षाची होते तेव्हा मला एक पुस्तक मिळाले ज्याने माझे जीवन बदलले.



त्याचे नाव होतं, "द स्टोरी ऑफ डॉक्टर डूलिटल" मी ते एकदा वाचलं. मग परत वाचलं, मग ते वाचनालयात परत करण्याच्या आधी तिसऱ्यांदा वाचलं. ते पुस्तक अशा एका अजब व्यक्तीबद्दल होते जी प्राण्यांशी बोलू शकत असे.

पुस्तकात, एक पोपट होता त्याच्यानुसार जर तुम्हांला प्राण्यांशी बोलायला शिकायचं असेल तर तुमच्यात 'निरीक्षण शक्ती' पाहिजे.

पण पुस्तकाचा तो भाग मला सगळ्यात जास्त आवडला ज्यात डॉ. डूलिटल आणि त्यांचे प्राणी मित्रांचा पाठलाग केला जातो आणि ते एका डोंगराच्या कड्याशी पोहचतात..

आपण
पलीकडे कसे
जाणार ?






मग माकडांनी एक-दुसऱ्याचे हात-पाय पकडले आणि ते एक पूल झाले. ते किती सुंदर होते.
आपण एकमेकांबरोबर काम करून खूप काही करू शकतो.

ते पुस्तक वाचल्यानंतर मी शपथ घेतली की मी आफ्रिकेत जाईन आणि प्राण्यांच्या मध्ये जाऊन राहील.

मी बारा वर्षाची होईपर्यंत माझा एक निसर्ग क्लब होता - एलीगेटर क्लब.

मी माझ्या मित्रांबरोबर एका म्हाताऱ्या घोड्याच्या मदतीसाठी पैसे जमवले.आम्ही निसर्गाची सफर केली, जे काही आम्ही पाहिलं ते आम्ही लिहलं (कमीत कमी मी ते केलं.)
आणि जर तुम्ही क्लब मध्ये उच्च पद मिळवू इच्छित असाल तर ..

तुम्हांला दहा कुत्री ओळखता आली पाहिजे.

दहा पक्षी

दहा झाडं

पाच फुलपाखर किंवा पतंग

मी पहिले जाऊ का?

वाटतं की ती सगळ्यांची नावं बरोबर सांगेल.

आम्ही प्रत्येकाने स्वतः साठी एक प्राण्याचे नावही ठेवले होते..

जेन, रेड-एडमिरल होती. तिचं नाव एक सुंदर फुलपाखरावरून ठेवलं होतं..

मी हुशार विद्यार्थिनी होते? बिलकुल नाही.

शाळेच्या दिवसात मला सकाळी लवकर उठणे मुश्कील होते.
मला घरात राहणे आवडत नसे.

जर आम्ही बाहेर आलो आणि माझ्याजवळ प्राणी असतील तर मी उत्साहित होते असे.

अंदाज करा माझ्याकडे किती पाळीव प्राणी असतील?

आईवोर नावाची एक पाल होती,जिला पाय नव्हते.

गांधी आणि जिमी नावाचे दोन गिनी-पिग्स होते.

गोगलगाय जिच्यावर संख्या लिहिली होती.

पिकल्स नावाचं मांजर होतं. .

हैमलेट नावाचा काहम्सटर होता

आणि पीटर नावाची कॅनरी होती.

आणि यात ती कुत्री सामील नाहीत ज्यांची मी काळजी घेतली होती, माझ्या आवडीचा रस्टी ज्याला पायजमा घालायला आवडे.

भुंकणे !

म्हणजे त्याला पायजमे आवडत.

मी अशा नोकरीच्या शोधात होते ज्यात मी प्राण्यांबद्दल अधिक शिकू शकेल. पण त्याकाळात मुलींसाठी विज्ञानिक होणं खूप कठीण होतं. लोकांना वाटे की मुलींनी नर्स, सेक्रेटरी किंवा शिक्षिका व्हायला पाहिजे.

मला आफ्रिकेत जायचं होतं. मला प्राण्यांचा अभ्यास करायचा होता. सुदैवाने माझी आई नेहमी म्हणायची.

जर तुला खरंच काही हवं असेल तर त्यासाठी खूप मेहनत कर!

जर तू हार मानली नाही तर तू नक्की काही रस्ता शोधून काढशील.

मी माझ्या आईच्या गोष्टी विसरले नाही. लवकरच मला एक संधी मिळाली.

माझ्या शाळेतल्या मित्राने मला केनियात त्याच्या कुटुंबां बरोबर राहण्यासाठी आमंत्रित केलं.




प्रवासखर्चासाठी मी वेट्रेस म्हणून काम केलं आणि माझे पैसे गालीच्या खाली लपवून ठेवले.

एक दिवस, मी पडदा लावून पैसे मोजले आणि...



मला नावेने प्रवास करत एकवीस दिवस लागले.



मी तेवीस वर्षाचे होते.



मला ते सर्व एका स्वप्नासारखे वाटत होते. मग मी एक जिराफ बघितले, जे  मला एकटक बघत होते.

त्याची खोल डोळे, लांब पापण्या आणि एक काळी जीभ होती. तो बाभळीचे काटे चावत होता.

मला माहित होतं की माझं स्वप्न  सत्यात उतरत होतं. शेवटी मी, डॉ. डूलिटलच्या आफ्रिकेत होते.

दोन महिन्यानंतर माझं जीवन परत बदललं.

कोणीतरी मला म्हटलं, “तुला जर प्राण्यांमध्ये रस आहे, तर तू एका माणसाला नक्की भेटायला पाहिजे.”




डॉ. लीकी एक मानववैज्ञानिक होते. म्हणजे लोक कसे राहतात याचा ते अभ्यास करत. त्याचबरोबर ते एक जीवाश्म-वैज्ञानिक पण होते. म्हणजे ते प्राचीन जीवाश्मों आणि हाडांचा अभ्यास करत होते. आधी त्यांनी मला सेक्रेटरी म्हणून नोकरी दिली.

पण पाळीव प्राण्यांबद्दल मला जे माहित होतं त्यामुळे ते खूप प्रभावित झाले.

शेवटी , डॉ. लीकी यांनी मला एका नव्या कामाबद्दल सांगितले, ज्यात चिंपांझीचा जवळून अभ्यास करायचा होता. पण ते म्हणाले की माझ्यासाठी जंगलात एकटं जाणे अवघड आणि धोकादायक आहे.

पण जर आपल्याला हे कळलं की आज चिंपाझी कसे राहतात, तर आपल्याला कळेल की आपले प्रागैतिहासिक पूर्वज कसे राहत होते.



एक वर्षभर मी चिंपाझीच्या बद्दल खूप सारं वाचलं.




मला हे ही सांगितलं गेलं की कोणी महिला जंगलात एकटी जाऊ शकत नाही.

त्यांनी सांगितलं की मला एका गाईडची आणि सहकाऱ्याची गरज भासेल..

माझी आई मला मदत करण्यासाठी यायला तयार झाली. मी पण तयार होते.




मी तो दिवस कधीच विसरणार नाही: १६ जुलै १९६० ला ज्या दिवशी मी प्रथम टंजानिया, आफ्रिकेच्या गोम्बे नॅशनल पार्क मध्ये पाय ठेवला.

तेव्हा मी २६ वर्षाची होते, मी शेवटी चिंपाझीच्या घरी आले होते.

ती अशी एक जागा होती,जी माझं आयुष्य बदलून टाकणार होती.

आमच्या पहिल्या शोधात आम्हांला दोन चिंपाझी दिसले ,जे एका उंच झाडावर काही खात होते..

त्यांनी आम्हांला पाहिलं आणि त्वरित पळून गेले. ते आम्हांला घाबरत होते.



दुसऱ्या दिवशी, आम्हांला एकही चिंपाझी दिसला नाही.



त्याच्या पुढच्या दिवशी पण एकही चिंपाझी दिसला नाही.



अनेक महिने मी त्यांच्या जवळ जाण्याचा प्रयत्न केला.पण ते पळून जात.

मग मी जंगलात एकटी जाऊ लागले,एकदम एकटी.मी एका उंच फांदीवर झोपत असे आणि तिथून दुर्बिणीने खाली चिंपाझी कडे बघत असे.

.



मी बघितलं की चिंपाझी सहा किंवा त्यापेक्षा कमी संख्येने फिरतात. आई चिंपाझी मुलांबरोबर राहते. नर चिंपाझी एक दुसऱ्या बरोबर राहतात. हे प्राणी, नासमझ जनावरं नव्हती. त्यांचा एक समुदाय होता.



तरीपण मला चिंपाझींच्या १०० मीटर पर्यंत पोहचायला एक वर्ष लागलं. एक दिवस, जेव्हा मी तंबूत परतले तेव्हा कळलं.




दुसऱ्या दिवशी मी वाट बघत राहिले, बघत राहिले. मला दूर-दूर पर्यत कोणी चिंपाझी दिसला नाही.

मग संध्याकाळी चार वाजता, मी माझ्या तंबूत खडखडाट झालेला ऐकला.



तो एक मोठ्या दाढ़ीवाला मोठा नर चिंपाझी होता.




हेच ते नाव होतं जे मी त्याला दिलं होतं.

त्याकाळी लोकांनी मला सांगितलं होतं की प्राण्यांचा अभ्यास करण्याची "निश्चित पद्धत' आहे - आणि मी चिंपाझींना नाव द्यायला नको.

त्यांनी मला सांगितलं की मी प्राण्यांना नंबर द्यायला हवेत, नाव नाही.

का?

त्यांचं म्हणणं होतं की प्राण्यांना काही व्यक्तित्व वा भावना नसतात.

लोक विचार करत होते की जर आम्ही प्राण्यांना नावं दिली तर अकारण आपण असं समजायला लागू की ते आमच्यासारखे आहेत.









नंतर तो  जंगलात हळूहळू माझ्या जवळ आला आणि हे तपासू लागला की माझ्या खिशात एखादं केळं आहे का?

 तो  माझ्यासाठी सगळ्यात गर्वाच्या क्षणांपैकी एक होता. इतर चिंपाझी  समजून गेले की त्यांना माझ्यापासून काही धोका नाही.






काळाबरोबर, चिंपाझींना वेगवेगळ्या रुपात बघून,
मी त्यांना खऱ्या अर्थाने समजू शकले.




डेविड शांत होता, खरंतर त्याला ते मिळालं तर हवं होतं.




गोलियथ सहज उत्तेजित होत असे.



विलियम लाजाळू होता.



ओल्ड फ़्लो एक मजबूत आई होती. जी नेहमी आपल्या मुली आणि मुलांची काळजी घेई.

चिंपाझीचे निरीक्षण करत मी खूप काही शिकले. एक दिवस मी डेविड ग्रेबियर्ड ला एका फांदीवरून पानं वेगळी करतांना पाहिलं. मग त्याने ती फांदी वाळवी च्या वारुळात घुसवली.



तो फांदीचा उपयोग फक्त एका हत्यारासारखा करत नव्हता तर तो हत्यार स्वतः तयार करत होता.



याआधी, वैज्ञानिक विचार करत की केवळ मनुष्यच हत्यार बनवू शकतो. आता कोणती शंका राहिली नव्हती की हे प्राणी खूप बुद्धिमान आहेत.

मी रोज जे बघत होते ते रात्री  डायरीमध्ये लिहून ठेवत असे. आणि रोज, मी चिंपाझींना तीच कामं करत असतांना पाहत होते जी माणसं करत असत.



हात पकड़णे.



गुदगुली करणे.



चुंबन घेणे.



एवढंच नाही तर एक-दुसऱ्याला आश्वस्त करण्यासाठी पाठ थोपटणे.

मी जितकं अधिक बघितलं, तितकं अधिक शिकले. लवकरच माझ्याजवळ एवढी माहिती जमा झाली की मला एका टेप रेकॉर्डरची आवश्यकता भासली. मग,मला जंगलातल्या इतर सगळ्या चिंपाझींचा परिवार बघण्यासाठी मदत व्हावी म्हणून एका सहाय्यकाची आवश्यकता पडली.

सहा वर्षानंतर नोटपॅड आणि दुर्बिणीने सुरु झालेलं काम आता एक पूर्ण शोध केंद्र झालं. आता मीच तिथली प्रमुख होते..




टंजानिया मधील आमच्या कामानंतर आज पूर्ण जगाला माहित आहे की जनावरांना व्यक्तित्व असते आणि ते जटिल सबंध प्रस्थापित करू शकतात.

माझ्या जीवनात लोकांनी मला सांगितलं होतक की गोष्टी करण्याची एक “निश्चित पद्धत” असते.

जनावरांचा अभ्यास करण्याची एक निश्चित पद्धत”

मुलींशी व्यवहार करण्याचा एक "निश्चित पद्धत "

त्यांनी मला नियमांचे पालन करायला सांगितलं.

याशिवाय मी नेहमीच मला उचित वाटलं ते केलं.



आपल्या जीवनात, हे बघणं सोप्पं होईल की दुसरे लोक आपल्यापेक्षा कसे ‘वेगळे’ आहेत.

पण याशिवाय जर आपण आपल्या लोकांमध्ये समानता बघितली तर आपल्याला सगळ्या लोकामध्ये “समानता” आढळेल.

आपण सगळे — जीवित प्राणी—एक- दुसऱ्या बरोबर बरेच काही वाटून घेवू शकतो.

आपली खूप साऱ्या गोष्टी एक-समान आहे. जेव्हा ही गोष्ट आपल्याला जाणवेल तेव्हा आपण एक-दुसऱ्याचा शोध घेवू.




हा एक दुसऱ्या बरोबर राहण्याची सगळ्यात सुंदर पद्धत आहे.
आज डॉ. गुडॉल यांचे काम वाढले. आणि प्रत्येक जागी लोकांना आठवण देते की आपण सगळेजण या धरतीला वाटून घेतो.
जेव्हा आपण पृथ्वीची रक्षा करतो तेव्हा आपण एक-दूसरयाची पण रक्षा करतो..
आता पण, जेन गुडॉल इंस्टीट्यूट बरोबर, आपल्या प्रेमळ चिंपाझी बरोबर अन्य लुप्त होणाऱ्या प्रजाती वाचवण्यासाठी काम करत आहे, याबरोबरच ती आपल्या पर्यावरणाची पण काळजी घेत आहे.
१30+ देशांमधले युवकांना १५0,00 पेक्षा अधिक समूहा बरोबर "रूट्स एंड शूट्स" नेटवर्क त्या सर्व वयातल्या युवकांना जोडतात जे एक चांगलं जग बनवण्याची इच्छा ठेवतात.
तुम्ही त्यांच्याबरोबर फोन वर बोलू शकतात. तुम्ही स्वतः पण पर्यावरणवादी होऊ शकतात.
तुम्ही प्राण्यांबरोबर काम करू इच्छितात का?
तुमच्या प्रिय प्राण्याचे लक्षपूर्वक निरीक्षण करा.
नोट्स काढा. त्यांच्याबद्दल पुस्तके वाचा..
ते बरेचसे आपल्या सारखेच आहेत..

मी जेन गुडॉल आहे, आणि मला असं दिसत आहे की आपल्यात खूप काही एक-समान आहे.

लक्षपूर्वक बघा, निरीक्षण करा. धीर ठेवा, हेच मी तुम्हांला शिकवेन.

आपण पृथ्वीचे मालक नाही.

आपण पृथ्वी इतर अन्य प्राण्यांबरोबर वाटून घेतो.

आपल्या आतल्या भावनांचे ऐका.

आपण आपल्या आसपासच्या प्राण्यांसाठी जबाबदार आहोत.

आपण त्यांची काळजी घ्यायला हवी. जेव्हा आपल्यातला कोणी संकटात असेल- मग तो मानव असो, प्राणी असो वा निसर्ग असो - तेव्हा आपल्याला जरूर मदत केली पाहिजे.

जेव्हा आपण तसे करतो, तेव्हा आपण एक पुल निर्माण करतो.
एक पूल जो आपल्या सर्वांना पलीकडे घेऊन जाईल.







१९६०च्या  सुरुवातीच्या दशकात
डेविड ग्रेबियर्ड बरोबर जेन



जेन लहानपणी जुबली बरोबर





डॉ. लीकी बरोबर जेन



"रूट्स एंड शूट्स" च्या सदस्या बरोबर जेन

“ आपल्या आस-पासच्या जगावर प्रभाव टाकल्याशिवाय आपण पृथ्वीवर एक दिवस सुद्धा राहू शकत नाही. आपण जे काही करतो त्याने फरक पडतो, म्हणून आपल्याला हे ठरवावं लागेल की तुम्हांला कशा प्रकारचे परिवर्तन पाहिजे आहे.”
— जेन गुडाल